**शासकीय दूध योजनेमार्फत संकलित होणाऱ्या दूध खरेदीचे सुधारीत दर निश्चित करण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमएलके २०१८/प्र.क्र.७३/पदुम ८**
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०००३२
दिनांक : ६ जून,२०१८

वाचा :

१) शासन निर्णय क्रमांक: कृषि व पदुम विभाग, क्रमांक एमएलके २०१३/प्र.क्र.९८/पदुम ८, दिनांक १९.६.२०१७
२) केंद्र शासनाच्या, अन्न सुरक्षा व मानक संस्था, यांचे पत्र क्र.A-१(१)/Standards/MMP/ २०१२(Part- I), दिनांक २.८.२०१७
३) आयुक्त दुग्धव्यवसाय विकास कार्यालयाच्या पत्र क्र. आदुवि -९/प्रदत्त समिती /भाग-१ / २०१८/३७/८३६, दि.१८.५.२०१८ अन्वये निर्गमित केलेले इतिवृत्त

**प्रस्तावना :**

शासनाने संदर्भाधिन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये शासकीय दूध योजनेकरीता संकलित होणाऱ्या ३.५ % फॅट व ८.५% एसएनएफ या गुणप्रतीच्या गाय दूध खरेदी करीता दर निश्चित केले आहेत. आता, केंद्र शासनाच्या अन्न सुरक्षा व मानक संस्था (FSSAI) यांनी संदर्भ क्र.२ अन्वये गाय दूध गुणप्रतीकरीता ३.२% फॅट व ८.३% एसएनएफ असे सुधारीत मानक (Standards) निश्चित केली आहेत. सदर सुधारीत मानकानुसार, सध्याच्या ३.५ % फॅट व ८.५% एसएनएफ यासाठी शासनाने संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या गाय दूध खरेदी दरामध्ये सुधारणा करण्याच्या अनुषंगाने सचिव (पदुम) यांच्या अध्यक्षतेखालील प्रदत्त समितीची दिनांक १५.५.२०१८ रोजी बैठक घेण्यात आली होती. सदर बैठकीचे इतिवृत्त संदर्भाधिन क्र.३ अन्वये निर्गमित करण्यात आले आहे.

प्रदत्त समितीच्या उपरोक्त बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार ३.५ % फॅट व ८.५% एसएनएफ या गुणप्रतीच्या दुधासाठी सध्या निश्चित करण्यात आलेल्या रु.२७/- या दराच्या समतूल्य दर, ३.२% फॅट व ८.३% एसएनएफ या गुणप्रतीच्या दुधाकरीता रु.२६.१०/- (प्रति फॅट ३० पैसे घट) असा दूध खरेदी दर निर्धारित करण्यात आला आहे. प्रदत्त समितीच्या वरीलप्रमाणे घेण्यात आलेल्या निर्णयानुसार गाय दूध खरेदी दरात सुधारणा करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :**

शासन या निर्णयान्वये गाय दूध खरेदीसाठी खालीलप्रमाणे दर निर्धारित करण्यास मान्यता देत आहे.

| गुणप्रत ( % फॅट व % एसएनएफ) | दर (रु. प्रति लिटर) |
|---|---|
| ३.२ /८.३ | २६.१० |
| ३.३/८.३ | २६.४० |
| ३.४/८.३ | २६.७० |
| ३.५/८.३ | २७.०० |
| ३.६/८.३ | २७.३० |
| ३.७/८.३ | २७.६० |
| ३.८/८.३ | २७.९० |
| ३.९/८.३ | २८.२० |
| ४.०/८.३ | २८.५० |
| ४.१/८.३ | २८.८० |
| ४.२/८.३ | २९.१० |
| ४.३/८.३ | २९.४० |
| ४.४/८.३ | २९.७० |
| ४.५/८.३ | ३०.०० |

उपरोक्त सुधारणा वगळता संदर्भाधिन क्र. ३ येथील दिनांक १९.६.२०१७ रोजीच्या शासन निर्णयातील अन्य बाबी कायम राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६०६१६३८४७०७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajesh Shaligram Govil

Digitally signed by Rajesh Shaligram Govil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture & ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c549410b2251df8c92783a2da17afcacbe7f8fe3a4fd88f156fea84433871f11, cn=Rajesh Shaligram Govil
Date: 2018.06.06 16:40:57 +05'30'

**(राजेश गोविल)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

२. मा.मंत्री (पदुम)/ राज्यमंत्री(पदुम)
३. विरोधी पक्ष नेता यांचे खाजगी सचिव
४. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव (सहकार), मंत्रालय, मुंबई
६. आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई
७. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ मर्या., गोरेगांव, मुंबई
९. महालेखापाल १/२, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) मुंबई / नागपूर
१०.अधिदान व लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
११.निवासी लेखा अधिकारी, मुंबई
१२.निवडनस्ती.